भाप्रसे अधिका-यांची बदली झाल्यावर
त्यांच्या अंतिम वेतनप्रमाणपत्रासोबतच
मूळ सेवापुस्तक पाठविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:- भाप्रसे-१०२१/प्र.क्र.१३३/(भाग-२)२०२१/९अ**
मंत्रालय, मुंबई :- ४०० ०३२
दिनांक :- २९ डिसेंबर, २०२१

**वाचा :- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, समक्रमांक दिनांक ०३.११.२०२१**

**शासन परिपत्रक :-**

सेवापुस्तक हे शासकीय अधिका-यांच्या सेवेचा अत्यंत महत्वाचा अभिलेख आहे. हा अभिलेख प्रदीर्घ कालावधीसाठी जतन करुन सुस्थितीत ठेवणे ही संबंधित कार्यालयांची जबाबदारी आहे. भाप्रसे अधिकाऱ्यांची बदली झाल्यानंतर बदलीच्या ठिकाणी त्यांचे अंतिम वेतन प्रमाणपत्र प्रथम/प्राधान्याने पाठविले जाते. परंतू सेवा पुस्तक पाठविण्यास विलंब होत असतो. त्यामुळे अद्ययावत रजा लेख्यांअभावी रजा मंजूरी तसेच अन्य प्रशासकीय कामकाजामध्ये अडचणी उद्भवतात. त्यामुळे भाप्रसे अधिकाऱ्यांची बदली होऊन बदलीच्या ठिकाणी ते रूजू झाल्यानंतर, त्यांच्या सेवापुस्तकामध्ये त्यांच्या खाती शिल्लक असलेल्या अर्जित/अर्धवेतनी रजांचा उल्लेख करुन तसेच त्या प्रमाणित करुन अंतिम वेतन प्रमाणपत्रासोबतच त्यांचे मूळ सेवापुस्तक बदलीच्या ठिकाणी विनाविलंब पाठविण्यांची कार्यवाही संबंधित आस्थापना अधिकारी/आहरण व संवितरण अधिकारी यांनी करणे गरजेचे आहे.

भाप्रसे अधिकाऱ्यांचे मूळ सेवापुस्तक बदलीच्या ठिकाणी पाठवितेवेळी वाचा मधील दि. ०३.११.२०२१ च्या परिपत्रकाप्रमाणे सेवापुस्तक अद्ययावत करुन तसेच रजेच्या अद्ययावत नोंदी घेऊन ते अंतिम वेतन प्रमाणपत्रासोबत पाठविण्यात यावे. सेवापुस्तकामध्ये सर्व नोंदी अचूकपणे घेतल्या असल्याची खातरजमा करुन घेण्याची जबाबदारी ही संबंधित कार्यालयाच्या आस्थापना अधिकारी/ आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील. कोणत्याही परिस्थितीत सेवापुस्तक अंतिम वेतन प्रमाणपत्रासोबतच बदलीने नियुक्तीच्या कार्यालयास पाठविले जाईल याबाबत दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून, त्यांचा सांकेतांक २०२११२२९१६५९१८२६०७ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sunil Gangaram Gangarkar
Date: 2021.12.29 17:00:45 +05'30'

**( सु. गं. गांगरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मंत्रालयीन सर्व भाप्रसे अधिकारी

२. सर्व मंत्रालयीन विभाग ( त्यांच्या अधिनस्त येणारी सर्व महामंडळे यांना संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागामार्फत)

३. सर्व जिल्हाधिकारी कार्यालये

४. सर्व जिल्हा परिषद कार्यालये,

५. सर्व विभागीय आयुक्त,कार्यालये

६. सर्व महानगरपालिका कार्यालये

७. कार्यासन ९ ,१० व १०-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२

८. निवड नस्ती.